मा.सेवानिवृत्त न्यायमूर्ती श्री.एम.जी.गायकवाड यांच्या अध्यक्षतेखाली गठित करण्यात आलेल्या समितीने सादर केलेल्या अहवालावर शासनामार्फत करावयाच्या कार्यवाहीसाठी शिफारस करण्याबाबत पूर्ण वेळ एक सेवानिवृत्त अधिकारी नियुक्त करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## आदिवासी विकास विभाग

**शासन निर्णय, क्रमांक : जहिया-२०१७/प्र.क्र.१६/२०१७/का.७,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक** : ३० ऑक्टोबर, २०१८.

**संदर्भ** : १) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्रमांक : जहिया-२०१७/प्र.क्र.१६/२०१७/का.७, दिनांक २९.०९.२०१७.
२) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्रमांक : जहिया-२०१७/प्र.क्र.१६/२०१७/का.७, दिनांक ०३.११.२०१७.
३) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्रमांक : जहिया-२०१७/प्र.क्र.१६/२०१७/का.७, दिनांक ०७.०४.२०१८.
४) शासन शुध्दीपत्रक, आदिवासी विकास विभाग क्रमांक : जहिया-२०१७/प्र.क्र.१६/२०१७/का.७, दिनांक २९.०५.२०१८.

**प्रस्तावना :**

आदिवासी विकास विभागामार्फत सन २००४ ते सन २००९ या कालावधीत राबविण्यात आलेल्या विविध योजनांमध्ये झालेल्या गैरव्यवहारांसंदर्भात, श्री.बहिरम पोपटराव पवार व इतर यांनी मा.उच्च न्यायालय, खंडपीठ मुंबई येथे दाखल केलेल्या जनहित याचिका क्रमांक १५३/२०१२ च्या अनुषंगाने मा.न्यायालयाने दिलेल्या निर्देशानुसार शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्रमांक : जहिया-२०१२/प्र.क्र.८०(भाग-४)/का.१६, दिनांक १५ एप्रिल, २०१४ अन्वये गठीत करण्यात आलेल्या न्या.गायकवाड समितीने शासनास सादर केलेल्या चौकशी अहवालाची छाननी करुन, शासनामार्फत करावयाच्या पुढील कार्यवाहीसंदर्भात शासनास मार्गदर्शन करण्याकरीता उपरोक्त नमूद संदर्भाधीन क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये श्री.पी.डी.करंदीकर, भा.प्र.से. (सेवानिवृत्त) यांची नियुक्ती करण्यात आली आहे. श्री.पी.डी.करंदीकर, भा.प्र.से. (सेवानिवृत्त) यांची कार्ये व मानधन उपरोक्त संदर्भाधीन क्रमांक २ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आले आहे.

उपरोक्त संदर्भाधीन क्रमांक ३ च्या शासन निर्णयान्वये श्री.पी.डी.करंदीकर, भा.प्र.से. (सेवानिवृत्त) यांच्या नियुक्तीस ऑक्टोबर, २०१८ अखेरपर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे.

श्री.पी.डी.करंदीकर, भा.प्र.से. (सेवानिवृत्त) यांचा नियुक्ती कार्यकाळ ऑक्टोबर-२०१८ अखेर संपुष्टात येत असून, न्या.गायकवाड समितीने सादर केलेल्या चौकशी अहवालावर शासनामार्फत करण्यात येणारी कार्यवाही, ही श्री.पी.डी.करंदीकर, भा.प्र.से. (सेवानिवृत्त) यांच्या मार्गदर्शनाखाली करण्यात येत आहे. तसेच, प्रस्तुत कार्यवाहीच्या अनुषंगाने विविध स्तरावरून प्राप्त झालेल्या निवेदनांवरील पुढील कार्यवाही, पोलीस विभागामार्फत मागविण्यात येत असलेल्या वेगवेगळ्या मुद्यांवरील मार्गदर्शन या बाबी विचारात घेता, श्री.पी.डी.करंदीकर, भा.प्र.से. (सेवानिवृत्त) यांच्या नियुक्तीस आणखीन सहा महिन्याची मुदतवाढ देण्यात यावी अशी आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांनी शासनास विनंती केली आहे. त्यानुसार, श्री.पी.डी.करंदीकर, भा.प्र.से. (सेवानिवृत्त) यांच्या नियुक्तीस मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

यानुषंगाने, शासन आता पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

## शासन निर्णय :-

मा.सेवानिवृत्त न्यायमूर्ती श्री.एम.जी.गायकवाड यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीने सादर केलेल्या चौकशी अहवालाची छाननी करुन, या अहवालाच्या अनुषंगाने शासनामार्फत करावयाच्या पुढील कार्यवाहीसंदर्भात शासनास मार्गदर्शन करण्याकरीता श्री.पी.डी.करंदीकर, भा.प्र.से. (सेवानिवृत्त) यांची पूर्ण वेळ एक सेवानिवृत्त अधिकारी म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे.

२. न्या.गायकवाड समितीच्या अहवालाची छाननी करून शासनाने करावयाच्या कार्यवाहीबाबत मार्गदर्शन करण्याकरीता श्री.पी.डी.करंदीकर, भा.प्र.से. (सेवानिवृत्त) यांची नियुक्ती करण्यात आली आहे. यामध्ये, गायकवाड समितीने आपल्या अहवालामध्ये नमूद केलेली कार्यवाही करण्याबाबतची कार्यपध्दती निश्चित करणे, गायकवाड समितीने सुचविलेल्या व करंदीकर समितीला आवश्यक वाटणाऱ्या अन्य उपाययोजना शासनास सुचविणे आणि याबाबतची अंमलबजावणी निश्चित करणे या बाबींचा समावेश आहे.

३. न्या.गायकवाड समितीने सुचविल्यानुसार फौजदारी व विभागीय चौकशीची कार्यवाहीची कार्यपध्दती निश्चित करून, सदर कार्यपध्दतीची अंमलबजावणी श्री.पी.डी.करंदीकर, भा.प्र.से. (सेवानिवृत्त) यांच्या मार्गदर्शनाखाली सुरू असून, प्रस्तुत कार्यवाहीच्या अनुषंगाने अनुभवी व तज्ञ अधिकाऱ्याच्या मार्गदर्शनाची आवश्यकता असल्याने, आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांची विनंती विचारात घेऊन, शासन श्री.पी.डी.करंदीकर, भा.प्र.से. (सेवानिवृत्त) यांच्या नियुक्तीस

नोव्हेंबर-२०१८ पासून एप्रिल-२०१९ अखेरपर्यंत सहा महिन्यांची मुदतवाढ देण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देत आहे.

४. श्री.पी.डी.करंदीकर, भा.प्र.से. (सेवानिवृत्त) यांच्या कामकाजासाठी, मानधन व इतर खर्चासाठी उपरोक्त संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णयान्वये रु.४२.३२ लक्ष इतकी रक्कम मंजूर करण्यात आली होती.

५. श्री.पी.डी.करंदीकर, भा.प्र.से. (सेवानिवृत्त) यांना एप्रिल-२०१९ अखेरपर्यंत मुदतवाढ देण्यात येत असल्यामुळे, उपरोक्त संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णयामधील परिच्छेद क्र.५ मध्ये दर्शविण्यात आल्याप्रमाणे आणखीन रू.४२.३२ लक्ष इतकी रक्कम समितीचे कामकाज व मानधन खर्चाकरीता मंजूर करण्यात येत असून, सदरचा खर्च शासन ज्ञापन क्र.पुनर्वि-२०१८/प्र.क्र.४५/का.६, दिनांक ०७.०३.२०१८ अन्वये, करंदीकर समितीच्या अहवालावर कार्यवाही करण्याकरीता आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांना उपलब्ध करून देण्यात आलेल्या निधीमधून खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

६. श्री.पी.डी.करंदीकर, भा.प्र.से. (सेवानिवृत्त) यांनी खाली नमूद कार्ये पूर्ण करावीत :-

अ) न्या.गायकवाड समितीने सादर केलेल्या चौकशी अहवालावर शासनामार्फत कार्यवाही सुरू करण्यात आल्यानंतर, आदिवासी विकास विभागांतर्गत कार्यरत अधिकारी/कर्मचाऱ्यांनी वैयक्तिकपणे, अधिकारी/कर्मचारी संघटना आणि विविध संघटनांमार्फत प्राप्त झालेल्या निवेदनांचा विचार करून, सदर निवेदनांबाबत पुढील कार्यवाहीबाबत आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांना मार्गदर्शन करावे,

आ) न्या.गायकवाड समितीने जेथे संबंधित अधिकारी/कर्मचाऱ्यांविरुध्द पोलीस स्टेशनमध्ये तक्रार दाखल करण्यात यावी आणि शिस्तभंगविषयक कार्यवाही सुरू करण्यात यावी असे नमूद केलेले आहे अशा प्रकरणी संबंधित अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या निश्चितीबाबत विशेष चौकशी पथकाला कार्यपध्दती निश्चित करून द्यावी,

इ) न्या.गायकवाड समितीने ज्या परिच्छेदांमध्ये शासनाने आणखीन तपास करून पुढील नियमोचित कार्यवाही करण्याची शिफारस केली आहे. अशा परिच्छेदांमध्ये विशेष चौकशी पथकांना कार्यपध्दती निश्चित करून द्यावी व त्यांच्याकडून अहवाल प्राप्त करून

घेऊन, पुढील कार्यवाहीबाबत आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांना मार्गदर्शन करावे,

ई) न्या.गायकवाड समितीने ज्या परिच्छेदांमध्ये शासनाने कार्यवाही करावी असे नमूद केले आहे. अशा परिच्छेदांचा अभ्यास करून, शासनाने कोणती कार्यवाही करावी त्याबाबत शासनास मार्गदर्शन करावे,

उ) आदिवासी विकास विभाग व त्याअंतर्गत कार्यरत आदिवासी विकास महामंडळ, शबरी महामंडळ, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था या संस्था अशा सर्व घटकांसाठी संस्थात्मक बळकटीकरण कसे करावे, हे सुचविण्यासाठी सध्याच्या संरचनेचा, कार्यपध्दतींचा तसेच, मुल्यमापन पध्दतींचा सर्वकष विचार करून, कल्पक, तंत्रज्ञानाधारित आणि कालसुसंगत उपाययोजना व भावी वाटचाल सूचित करावी. आदिवासी उपयोजनेअंतर्गत निधी वितरण, खर्च संनियंत्रण, मुल्यमापन व आढावा याबाबत उचित कार्यपध्दती सूचित करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक २०१८१०३०१७१३४०९८२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Yogesh Anant Sawant

Digitally signed by Yogesh Anant Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7cefaf50ac0e3c1b6570c758525237ee6d89f57ad6f8775d3c4a59d92d913372, serialNumber=77973a624bfd4f8a425ba05be79e2e1b944af2ef7cf654ef6ed8da70148750e2, cn=Yogesh Anant Sawant
Date: 2018.10.30 17:22:11 +05'30'

**( योगेश अ. सावंत )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४. मा.विरोधी पक्षनेता यांचे खाजगी सचिव, विधान सभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
५. मा.विरोधी पक्षनेता यांचे खाजगी सचिव, विधान परिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
६. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. प्रधान सचिव (लेखा व कोषागारे), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. सचिव, मुख्य सचिव कार्यालय, मुंबई,
९. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
१०. सचिव, संसदीय कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई,

११. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
१२. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,
१३. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास,
१४. सर्व प्रकल्प अधिकारी, आदिवासी विकास,
१५. श्री.पी.डी.करंदीकर, भा.प्र.से. (सेवानिवृत्त), जी-१५, अथश्री कॉम्प्लेक्स, मगरपट्टा, मुंढवा रोड, हडपसर, पुणे-४११०३६,
१६. निवड नस्ती.